**कुर्झे मध्यम प्रकल्प, ता डहाणु, जि. पालघर या प्रकल्पातून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अंतर्गत वाढवण बंदर पाणी पुरवठा योजना ता. डहाणु, जि. पालघर करिता पाणी आरक्षण, मोठया प्रमाणात पाण्याचा हक्क (Bulk Water Entitlement) मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:बिसिंआ-२०२४/प्र.क्र.१८७/२४/सिं.व्य.(धो)**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
दिनांक :- ०१/०८/२०२४.

संदर्भ : - १) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र दि.१९/०६/२०२४.
२) शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण-२०१५/(४४/१५)/सिंव्य (धोरण) दि.१७/११/२०१६.
३) शासन परिपत्रक क्रमांक:संकीर्ण-२००८/(१३१/०८) सिंव्य (धोरण) दि.०६/०३/२००९.
४) शासन निर्णय क्रमांक:बिसिंआ-२०१९/प्र.क्र.३६५/२०१९)/सिंव्य (धो), दि.०१/११/२०२३.
५) शासन परिपत्रक क्रमांक:पापव-२०१५/(प्र.क्र.४००/२०१५)/सिंव्य (महसूल) दि.१५/१२/२०१५.
६) शासन निर्णय क्रमांक:पापव-२०१५/(प्र.क्र.८८/२०१५)/सिंव्य (महसूल) दि.२१/४/२०१६.
७) शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण-२०१०/(४०७/१०)/सिंव्य (धोरण), दि.२९/०६/२०११.
८) शासन निर्णय क्रमांक:देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिंव्य (कामे) दि.१७/११/२०१६.
९) शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण २०१८/(५११/१८)/सिंव्य (धोरण) दि.०१/१२/२०१८.
१०) शासन निर्णय, क्रमांक:संकीर्ण २०१८/(५११/१८)/सिंव्य (धोरण) दि.२०/०७/२०१९.
११) महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई यांचे दि.२९/०३/२०२२ चे आदेश.

**प्रस्तावना :-**

संदर्भिय पत्र क्र.१ अन्वये कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचेकडून कुर्झे मध्यम प्रकल्प, ता डहाणु, जि. पालघर या प्रकल्पातून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अंतर्गत वाढवण बंदर पाणी पुरवठा योजना ता. डहाणु, जि. पालघर योजनेकरीता पाणी आरक्षण, मोठया प्रमाणात पाण्याचा हक्क (Bulk Water Entilement) मंजूर करणेबाबत प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये बिगर सिंचन मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क प्रस्तावांना मंजुरी देण्यासाठी क्षेत्रिय वाटपाच्या मर्यादेनुसार सुधारित स्तर निश्चित करण्यात आलेले आहेत. या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२.३ मधील तरतुदीनुसार पिण्याच्या व औद्योगिक पाणी वापराच्या बिगर सिंचन मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क प्रस्तावांना मान्यता देण्याचे अधिकार मा.मंत्रीमंडळ उप समितीला देण्यात आले आहेत. याअनुषंगाने शासनास प्राप्त झालेल्या सदर प्रस्तावास मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :-

मा. मंत्री, जलसंपदा यांचे अध्यक्षतेखाली दि.३०/०७/२०२४ रोजी संपन्न झालेल्या मा.मंत्रिमंडळ उपसमितीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार व सदर बैठकीच्या मंजूर इतिवृत्तानुसार खालील तक्त्यातील रकाना क्र.२ मध्ये नमूद संस्थेला त्यांचे नावासमोर रकाना क्र.५मध्ये नमूद मोठ्या प्रमाणात पाण्याच्या (Bulk Water Entitlement) हक्कास, परिच्छेद ३.० मधील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | पाणी वापराचा प्रकार | जलाशय / कालवा/ नदीचे नाव | मंजूर केलेले मोठया प्रमाणात पाण्याचा हक्क (Bulk Water Entitilement) (दलघमी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | वाढवण बंदर पाणी पुरवठा योजना ता. डहाणु, जि. पालघर करिता | पिण्यासाठी व औद्योगिक | कुर्झे मध्यम प्रकल्प | पिण्यासाठी = ३.३७५ दलघमी<br>वाणिज्यिक = १.२०३६ दलघमी<br>एकूण = ४.५७८ दलघमी |

२.० उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर पाणी आरक्षण मंजुरी मुळे होणाऱ्या सिंचन कपातीपोटी सिंचन पुनर्स्थापनेचा खर्च संदर्भ क्र.३ नुसार रु. १ लक्ष प्रति हेक्टर प्रमाणे (Base Year २००९) अधिक भाववाढ निर्देशांक (Cost Inflation Index) विचारात घेऊन येणारी रक्कम अथवा प्रत्यक्ष करारनामा करतेवेळी लागू असलेला शासनाचा प्रचलित दर यापैकी जो जास्त असेल त्या दराने सिंचन पुनर्स्थापनेचा खर्च करारनामा करणेपुर्वी संस्थेकडून घेण्यात यावा. त्यासाठी कुर्झे प्रकल्पाच्या मूळ नियोजनानुसार जेवढ्या क्षेत्राचे सिंचन करण्याचे नियोजित होते, तेवढे क्षेत्र विचारात घेऊन त्यात होणाऱ्या कपातीचा विचार करावा. याबाबतची अंकगणितीय परिगणना मुख्य अभियंता यांनी प्रमाणित करावी.

२. बिगर सिंचन पाणी पुरवठयासाठी करारनाम्याचा सुधारीत नमुना व मार्गदर्शक तत्वे संदर्भ क्र.४ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार करारनामा करण्यात यावा.

३. संदर्भ क्र.५ अन्वये बिगरसिंचन पाणी पाणीवापराचे करारनामे करणे व नुतनीकरण वेळेवर करणे बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत संदर्भ क्र.६ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

५. संदर्भ क्र.७ अन्वये करारनामा करताना बिगरसिंचन पाणीवापरकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्प्याटप्प्याने पाणीवापर करण्याचे नियोजन नमुद करु शकतील.मात्र संस्थेने या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ५ वर्षात वरील तक्त्यातील स्तंभ ५ मध्ये नमूद पाणी आरक्षणापेकी प्रत्यक्ष पाणी उचल सुरु केला नाही, तर सदर पाणी आरक्षण आपोआप रद्द होईल. त्याचप्रमाणे महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाचे आदेश दि.२९/०३/२०२२ मधील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. संदर्भ क्र. ८ अन्वये पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सिंचन प्रकल्पांचे व्यवस्थापन पाटबंधारे महामंडळाकडे वर्ग करणे व पाणीपट्टीची रक्कम प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास मान्यता देणेसाठीचा निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

७. पाणी उचलण्याची/ पुरवठ्याची जागा व क्षेत्रीय परिस्थितीनुसार इतर अटी शर्तीचा अंतर्भाव करून संबधित मुख्य अभियंता यांनी सविस्तर ज्ञापन तात्काळ निर्गमित करावे .

8. "This reservation is only the letter of support for the, water supply scheme or the industry as the case may be. Actual quantity of water that will be supplied every year shall be governed by the entitlement granted to the water user entity by the River Basin Agency based on the population and the reasonable use norm decided by this Authority and the yearly allocation declared by the prescribed Authority on the basis of reservoir contents of the year and shall be subjected to various provisions in the agreement that will be signed by the water user entity with River basin Agency."

९. सदर पाणी मंजुरीच्या अनुषंगाने पिण्याच्या प्रयोजनार्थ पाणी वापर करताना उपलब्ध करुन दिलेल्या पाण्याची गुणवत्ता पिण्यास योग्य (potable) करण्याकरिता आवश्यक उपाययोजना करण्याची जवाबदारी उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.२ मध्ये नमुद संस्थेची राहील.

३.० हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८०११५२२४४०२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

RAKESH RAMESH DHAKTODE

Digitally signed by RAKESH RAMESH DHAKTODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENNT,
2.5.4.20=69a0a0c282321cd50759636fdbb15f4c636ac33cb80ec37e191ab6c903a8972f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=971E5F530A02C1FE1B0AB4137448EB5EB88DE5355622B221109949A576B7E688, cn=RAKESH RAMESH DHAKTODE
Date: 2024.08.01 15:37:00 +05'30'

**( राकेश धाकतोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा/वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव, (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. सचिव,(प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१३. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१४. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई.
१६. अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे.
१७. निवड नस्ती कार्यासन सिंव्य (धोरण).